यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त
विद्यापीठ, नाशिक येथील सिस्टीम
ॲनालिस्ट व फ्लोअर मॅनेजर या पदांच्या
वेतनश्रेणीत सुधारणा करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन,

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग,

शासन निर्णय क्र.वायएमयु २०११/(२४४/११)-विशि-१,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२, दिनांक १६ सप्टेंबर, २०११.

**वाचा :** १) कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे पत्र क्र.यचममुवि/कुलसचिव/३९१/२०११, दिनांक २४ मार्च, २०११.
२) कुलगुरू, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे पत्र क्र.यचममुवि/कुलसचिव/३९१/२०११, दिनांक २४ मार्च, २०११.
३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.युएनआय/२०११/वेतनश्रेणी/यचममुवि/विशि-१/१७२८, दिनांक १८.०६.२०११.

**प्रस्तावना :-** यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक येथील सिस्टीम ॲनालिस्ट व फ्लोअर मॅनेजर या पदांच्या पाचव्या वेतन आयोगातील वेतनश्रेणीत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक या विद्यापीठातील फ्लोअर मॅनेजर या पदाच्या पाचव्या वेतन आयोगातील व सिस्टीम ॲनालिस्ट या पदाच्या सहाव्या वेतन आयोगातील वेतनश्रेणीत खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र. | पदनाम | सध्याची वेतनश्रेणी | सुधारीत वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १. | फ्लोअर मॅनेजर | रु.४०००-६००० | रु.६५००-१०५०० |
| २. | सिस्टीम ॲनालिस्ट | रु.८०००-१३५०० | रू. १५६००-३९१०० व ग्रेड पे ६६०० |

२. सदर शासन मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.
(i) याबाबत होणारा सर्व खर्च विद्यापीठाच्या निधीतून भागविण्यात यावा.
(ii) यासंदर्भातील कोणताही आर्थिक भार शासन सोसणार नाही.

(iii) सदरच्या २ पदांच्या वेतनश्रेणीतील सुधारणा दिनांक ३१ डिसेंबर २००५ पासून लागू करण्यात येत आहे. परंतु, दिनांक ३१ मार्च, २००९ पुर्वीच्या कालावधीतील थकबाकी देय राहणार नाही.

(iv) दिनांक १ एप्रिल, २००९ पासून पुढील कालावधीतील थकबाकी अनुज्ञेय राहील.

३. सदर शासन मान्यता यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ अधिनियम १९८९ च्या कलम २९(१)(ii) मधील तरतूदीअन्वये देण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय शासनाच्या **www.maha rashtra.gov.in** वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०११०९१६१५३७४३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

स्वाक्षरी/-
(विकास तु. कदम)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे उपसचिव, मलबार हिल, मुंबई,
२) कुलगुरु, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक,
३) कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक,
४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५) सह संचालक, उच्च शिक्षण, पुणे विभाग, पुणे,
६) महालेखापाल(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
७) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
९) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,
१०)निवड नस्ती/विशि-१